# ज्यूली

खोलीच्या कोपऱ्यात ठेवलेल्या शिलाई मशीनच्या दिशेनेच आवाज येत होता. "मला का नाही? मला का नाही?" कोपऱ्यातल्या शिलाईच्या पायमशीनच्या खालून आवाज येत होता. तिथे बसून छकुलीने "मला का नाही?" चा घोशाच लावला होता. तिला पक्के आठवत होते, ताईच्या वाढदिवसाला आईने तिला चांगला सॅटिनचा नवा फ्रॉक शिवला, तिला आवडणाऱ्या पाकातल्या पुऱ्यांचा घाट घातला. औक्षण करून अगदी "हरळी सारखी वेल वाढो व कापसासारखी म्हातारी हो" असा आशीर्वादही दिला. संध्याकाळी बाबांनी सर्वांना समुद्रावर नेऊन भेळ दिली व वर शहाळ्याचे पाणीही पाजले सर्वांना. काय मज्जा आली ताईच्या वाढदिवसाला. तिच्यासारखाच माझापण वाढदिवस साजरा करायचा हे ठरलेले. पण नेमकी माझ्या वाढदिवसाला आजी आजारी पडली आणि मग सगळी धावपळ, पळापळ, डॉक्टरांची विझिट. सारेच चित्र पालटले. छकुलीचे मन धुमसू लागले. आईने कशीबशी तिची समजूत काढली. १-२ दिवसांनी नवीन फ्रॉक शिवण्याचे कबूल केले. वर सिनेमाला सुद्धा नेण्याचे ठरले. पण छे. वाढदिवसाचे औक्षण, वर सगळ्यांनी केलेले कौतुक, ती मजा सगळी किरकिरी झाली. नंतर फ्रॉक शिवला आईने पण सिनेमाचे मात्र राहूनच गेले. छकुलीने फारच हट्ट धरला तेव्हा तर आईने धपाटाच घातला तिच्या पाठीत. छकुली अधिकच चिडली. मशीनच्या सापटीत तिच्या क्रोधागारात जाऊन तिने असा "मला का नाही" चा जपच सुरु केला. राग आला की बसायची तिची ती स्पेशल जागा होती. तिथे पटकन कोणाला जाता यायचे नाही. मशीनच्या पुढे आईचे बसायचे स्टूल होते. शेजारीच एक छोटे टेबल असून त्यावर कात्र्या, सुया, दोरे असे तिचे शिवणाचे सामान असायचे. त्या कोपऱ्याच्या वाटेला फारसे कुणी जात नसे. मग छकुलीचा राग निवळेपर्यंत अगदी एकटी ती पाहिजे तेवढा वेळ तिथे

बसे. आजूबाजूचे सारे ही गोष्ट विसरून जात. मग केव्हातरी ती बाहेर येऊन दैनंदिन कामात रमे. पण याचा अर्थ तिचा राग शांत झालेला नसे. ताईच्या तर काही गावीच नसे. ती, तिचा अभ्यास, तिच्या मैत्रिणी यातच गुंग असे.

छकुली दिसायला छान नाजूक होती. घाऱ्या डोळयांची, भुऱ्या केसांची. पटकन कुणालाही आवडावी अशीच. पण असे सारखे काही ना काही तिच्या बाबतीत घडे की तिचा गोरा नाजूक चेहरा नेहमी रागावलेला, त्रासलेला व घारे डोळे नेहमी रागीटच दिसत. मग एक प्रकारचा तुसडा भाव तिच्या चेहऱ्यावर येई. यामुळे छकुलीला फारश्या मैत्रिणी सुद्धा नव्हत्या. मग तिची नजर वळे ताईच्या मैत्रिणींकडे. त्या मात्र तिच्याशी फारश्या बोलायच्याच नाहीत. त्यांच्या सारख्या आपल्या अभ्यासाच्याच गप्पा नाही तर शाळेतल्या बाईंच्या नकला. म्हणजे त्याही आवडत छकुलीला. ताई संध्याकाळी बाहेर जाई. त्यावेळाकडे ती नीट लक्ष ठेवून असे. त्या आपल्याला कटवणार हे तिला माहितच असे आणि अगदी तसेच होई. आजही पुन्हा तसेच झाले. आता छकुली अगदी चिडली. ते काही नाही याचा ती नक्कीच बदला घेणार. ताई एकटीच तिला टाकून कशी काय बाहेर जाऊ शकते, मजा करू शकते. आईही तिला नेहमी सांगते मलाही बरोबर घेऊन जा. पण त्या अशा गुंगारा देऊन पळतातच. छकुलीने रागारागाने ताईचे कपाट उघडले. आत तिचे कपडे अगदी व्यवस्थित घड्या घालून ठेवले होते. पुढचा शनिवार येईपर्यंत पूर्ण आठवड्याची ताईने कपड्यांची तयारी करून ठेवली होती. छकुलीने फर्रऽऽकन एक परकर पोलके ओढले. कपडे विस्कटले व ताईचे परकर पोलके घालून बसली. ताईचे परकर पोलके तिला अगदी ढगळ व लांब होत होते. काय ध्यान दिसत होते. पण आता छकुलीचे मन थोडे शांत झाले. ताईने आल्यावर खूप बडबड केली. पण बरे झाले.

आईच तिला बोलाली. अगदी रागावलीच. “काय झाले एक दिवस तुझा परकर पोलका घातला म्हणून. तुझी लहान बहीणच आहे ना? शिवाय तुम्ही तिला चुकवून बाहेर गेलातच का आधी? मग ती एकटी घरात बसून काय करणार?” “पण म्हणून काय माझे सगळे कपडे उसकायचे?” ताई रागारागाने म्हणाली. “आणि तिला बरोबर नेलं तर ती दमते लवकर. मग आम्हालाही फिरून देत नाही व स्वतःही नीट खेळत नाही. मग कशाला नेणार तिला बरोबर?” पण आईने ताईकडे साफ दुर्लक्ष्य केले. छकुलीला अपेक्षित परिणाम साधला.

ताई दिसायला चारचौघी सारखी, तब्येतीने दणकट व बुद्धीने तल्लख. आई बाबांना तिची काळजी वाटत नसे. सगळी काळजी काय ती छकुलीची. तिचा नाजूकपणा आणि अशक्तपणा म्हणजे तिच्या शेफारण्याचा परवानाच जणू. आजही तसेच झाले. छकुली अशीच रागावून घराच्या पायरीवर एकटीच बसली होती. तोच तिला म्यॉव् म्यॉव् असा आवाज ऐकू आला. एक गोंडस, पिटुकली शुभ्र अंगाची व अंगावर काळे भुरके पट्टे असलेली, छोटीशी मनी माऊ तिच्याकडे पाहून ओरडत होती. “अय्या कित्ती गोड” छकुलीचा राग कुठल्या कुठे पळाला. खरच किती छान आहे ही. माझ्यासारखीच गोरी गोरी, घाऱ्या डोळयांची, नाजूक आवाजाची. त्या ताईच्या मैत्रिणी हिच्या पुढे काहीच नाहीत. आडदांड म्हशी नुसत्या.” तिचा राग ताईच्या मैत्रिणींवर जणू आपटलाच. तिने मनीमाऊच्या पाठीवरून हळूवार हात फिरवला. मनीमाऊनेही छकुली आवडल्याची पावती देत बिनधास्त तिच्या मांडीवरच बसकण मारली. छकुली उठली व चालू लागली तशी मनीही तिच्या मागे मागे येऊ लागली. मग छकुली गोल गोल रिंगण करून धावू लागली. मनीही तिच्या पाठोपाठ उड्या मारू लागली. कित्ती गम्मत. आता छकुलीचा राग कुठल्या कुठे पळाला. तिच्या

गोऱ्या गालांवर हसू फुलले. असा किती वेळ गेला कुणास ठाऊक, मग तिला भुकेची आठवण झाली. "हो आणि मनीमाऊलाही भूक लागली असणारच. तिलाही माझ्याबरोबर दूध हवे." इतका वेळ ही काय करते आहे म्हणून आई बघायला आली. मनीचा व छकुलीचा खेळ पाहून, तिचे हसरे तोंड पाहून आईही खुलली. कौतुकाने छकुलीच्या पाठीवर थाप मारून आई म्हणाली, "मस्त आहे हं तुझी दोस्त. चला दोघींनाही खाऊ देते. खूप खेळलात." मग आईने छकुलीचा कप व मनीची बशी दुधाने भरली आणि एकदमच दोघींपुढे ठेवली. "आई, मनीचे नांव मी काय ठेवले आहे माहीत आहे का? ज्यूली." "अरे व्वा! एकदम इंग्रजी नांव का?" आईने एक पेढा काढून छकुलीच्या हातावर ठेवला. छकुलीने न विसरता त्यातला अर्धा ज्यूलीला भरवला. "बघ ग बाई! खातेय का ती?" आई म्हणाली व समाधानाने हसली.

– सरस्वती दातार

# बालपण

मुले म्हणजे फुले असं म्हटलं जातं. निष्पाप, निरागस मुलांची बालबुद्धीही तल्लख असते. विचार करायची क्षमता, ताकद त्यांच्यात असते. कधीकधी तर लहानग्यांकडून नकळतपणे शाब्दिक, प्रासंगिक विनोद घडतात. विनोद जीवनातील अविभाज्य भाग आहे. तो आपल्याला क्षणिक आनंद देत असेल परंतु जीवनातील मोठी मोठी दुःख सहज कमी करतो. मानसिक ताणतणाव कमी करतो.

माझी मुलगी निकीता दोन वर्षाची होती. आम्ही तिला विविध प्रकारच्या प्राण्यांचे-पक्षांचे नआवाज शिकवले. तिला खूप मजा वाटली. मध्यंतरी खूप दिवस गेले. आमच्या घरी मित्रमंडळी जमली. आपल्या मुलीचं कौतुक सगळ्यांना दाखवावं म्हणून मी निकीताला विचारलं,

"निकीता, कावळा कसा बोलतो?"

"कावऽऽ कावऽऽ" ती म्हणाली.

"चिमणी कशी बोलते?"

"चिवऽऽ चिवऽऽ"

"पोपट कसा बोलतो?"

"पोवऽऽ पोवऽऽ" ती तत्परतेने उद्गारली.

सगळे खो खो हसू लागले. आम्हाला हसावं की नाही काहीच कळेना. तिची बालबुद्धी वापरून तिने दिलेले उत्तर चुकीचे तरी कसे म्हणायचे? अजूनही जेव्हा जेव्हा मित्र मंडळी जमतात, निकीताला "पोपट कसा बोलतो?" विचारतात. आणि मग तिनं उत्तर देण्याआधीच खळखळून हसतात. आता तर आमच्या ग्रुपचा हा एक कायम स्वरुपी विनोद झाला आहे.

निकीता साधारण अडीच वर्षाची असेल, आम्ही सर्व घरातले माझ्या पतीला नावाने हाक मारायची, 9प्रवीण" म्हणून, तर निकीतासुद्धा 9प्रवीण" हाक मारायची. आम्ही तिला अनेकदा

समजावलं की आम्ही त्याला 9प्रवीण“ म्हटलं तरी तू 9बाबा“ म्हणायचं. शेवटी तिला बाबा म्हणायची सवय झाली. तरी अधून मधून आम्ही तिला विचारायचो. 9प्रवीण“ ला काय म्हणायचे?
तीही मुकाट्याने, “प्रवीण नाही 9बाबा“ म्हणायचे!” असं उत्तर द्यायची.

दरम्यान तिच्या शाळेच्या प्रवेशासाठी आम्ही तयारी सुरु केली. सगळं व्यवस्थित शिकवलं. नाव, पत्ता, रंग, वस्तूंची नावं, प्राणी, पक्षी, झाडं, आकार... वगैरे. शाळेच्या मुलाखतीला तिला पहिला प्रश्न विचारला,

“तुझं पूर्ण नाव काय?”

“निकीता बाबा सराफ” ती शांतपणे उत्तरली.

तिच्या उत्तराने आम्ही दोघेही अस्वस्थ झालो. त्या मुलाखत घेणाऱ्या बाईनं विचित्र नजरेनं आमच्याकडे पाहिलं आणि निकीताला विचारलं, “तुझ्या बाबांचं नाव काय?”

“प्रवीण नाही म्हणायचं, बाबा म्हणायचं”

घोकंपट्टी केल्यासारखं ती उत्तरली. आम्ही शिकवलेली एक चांगली सवय, आमच्याच तोंडघशी पडेल असं वाटलं नव्हतं.

आम्ही नवीन सोसायटीत राहायला गेलो. निकीता चार वर्षाची असेल. ती पहिल्याच दिवशी खेळायला गेली. पंधरा-वीस मिनिटांनी एक मुलगा, साधारण नऊ-दहा वर्षाचा असेल, निकीता सोबत आमच्या घरी आला, म्हणाला, “आण्टी आपकी लडकी बहोत ग्रेट है.”

मी मनात विचार केला, काय माहीत काय केलं असेल पोरीनं. तर तो पुढे म्हणाला, “मै इतना बडा हूँ, मुझे मराठी नही आती. मै दोनों र्स्‌में फेल हो गया और आपकी बेटी ईई बढीयाँ मराठी बोलती है, कितनी ग्रेट है.”

आमच्या सोसायटीत पंच्याहत्तर घरांपैकी दोनच मराठी

कुटुंबीय होते. मला झाला प्रकार लक्षात आला. हसू आलं. त्या मुलाला आमची मातृभाषा 9मराठी“ आहे हे सांगितलं. पण ते त्याला कळलं नाही.

असे गमतीदार प्रसंग शेजारीपाजारी घडतच असतात. आनंद देऊन जातात, मलाही लहान होता येईल का?

बालपणीचा काळ सुखाचा<br>
आठवणींवर त्याच्या सरे<br>
आयुष्यातील काळ दुःखाचा!

- प्रा . प्रतिभा सराफ

९८३३०५६७९५, ९८९२५३२७९५

# संस्कार आई आणि बाईचे

"लहान मूल म्हणजे मातीचा गोळा आकार द्यावा तशी मूर्ती घडते." हे अगदी सत्य आहे. मूळात लहान वयातच मूलांवर चांगले संस्कार घडविले तर ह्या कोवळ्या वयातील मुले चांगल्या गोष्टींचे अनुकरण करून संस्कारशील होतात व हे कार्य घरातील आई आणि शाळेतील बाई सातत्याने करीत असतात. अगदी छोट्या छोट्या गोष्टींतून आई व बाई मुलांवर संस्कार घडवितात. जसं आई घरात सकाळी मुलांना लवकर उठविते, प्रातः विधी आंघोळ झाल्यावर देवाला नित्यनेमाने नमस्कार करायला शिकविते. घरातील मोठ्यांना नियमित नमस्कार करण्यास सांगते. वेळेत शाळेत पाठवते. मुलांचा अभ्यास करून घेणे, वेळेत जेवणे, झोपणे, चांगले वाचन, लेखन या सर्वांची सवय आई मुलांना लावते व आईच्या मायेत ही मुलं लहानाची मोठी होतात.

घरातील आई व शाळेतील बाई या शाळेतील बाईही मुलांना फार जपतात, चांगले संस्कार त्यांच्यावर घडवितात. आई प्रेमाने, आपुलकीने मायेने व वात्सल्याने आपल्या पोटच्या बाळाला आपलंसं करून भावनिक आधार चांगल्या सवयी, शिस्त, सद्वर्तनाचे संस्कार घडवितात. अगदी शाळेच्या पहिल्याच दिवशी लहान मुलांना आपल्या आईची आठवण आल्यावर ती रडतात त्यावेळी त्यांना सांभाळण्यासाठी शाळेतील बाई पुढे सरसावतात. त्यांना चांगल्या सवयी लावतात. जसं वर्गात प्रवेश घेण्याआधी "बाई आत येऊ का?" वर्गात कोण दुसऱ्या बाई आल्यावर सर्व विद्यार्थ्यांनी उभं राहून त्यांना नमस्कार करून त्यांचं स्वागत करणं, वर्ग सुरू झाल्यावर प्रार्थना म्हणणं, बोधपर कथा विद्यार्थ्यांना सांगणं डबा खाताना देवाचे नामस्मरण करून "अन्न हे पूर्णब्रह्म" चे संस्कार रुजविणे. स्वतःच्या चुका कबूल करणे अशा कित्येक गोष्टी बाई आपल्याला शाळेत शिकवितात. अशा या "आई" आणि "बाई" विद्यार्थ्यांच्या भावविश्वात प्रत्यक्ष,

अप्रत्यक्षपणे बरेच संस्कार करून त्यांच्या सर्व क्षमता विकसित करून त्यांना स्वतःला व्यक्त करण्याची व समाजात समायोजन साधण्याची, सर्वांमध्ये मिसळयाची, सर्वांना आपलसं करण्याची व आपले विचार परस्परांबरोबर मांडण्याची खूप चांगली संधी देतात आणि म्हणूनच मुले ही आई आणि त्यांचे अनुकरणही करतात.

आईने सांगितलेली एखादी गोष्ट बाईंना सांगतात व बाईंनी सांगितलेल्या बऱ्याच गोष्टी ह्या केवळ आईपर्यंत नाही तर साऱ्या घरातील सदस्यांपर्यंत पोहचतात. आई आणि बाईमधील दुवा जणू ही चिमुरडी मुलं असतात. बाईंची प्रत्येक गोष्ट त्यांना छान लक्षात राहते, मग बाईंनी शिकवलेली प्रार्थना, पाढे, अभ्यास, कविता गाणी सारं त्या मुलांच्या मनात ठसून राहिलेलं असतं. बाईंनी डबा कसा सर्वांसोबत वाटून खावा, ज्याने डबा आणला नसेल त्याला आपल्या डब्यातील खाऊ द्यावा. एखाद्याची वस्तू आपल्या दप्तरात आली तर ती दुसऱ्या दिवशी त्याला परत करावी, मोठ्यांशी आदराने व आपल्या बरोबरच्या व्यक्तींशी मैत्रीने वागावे, नेहमी खरे बोलावे, सर्वांना सहकार्य करावे. अशा कितीतरी गोष्टी बाईंनी शाळेत मुलांना शिकविलेल्या असतात व या सर्वांतून सुंदर, सतेज, बुद्धिमान, ज्ञानी, शिस्तबद्ध, संस्कारक्षम, प्रसन्न व तेजोमय मूर्ती कशी व कधी घडते हे बाई व आई दोघींनाही कळत नाही. मग अनेक वर्षांनी रस्त्यातून चालत असताना कानावर हाक येते नमस्कार बाई मला ओळखलात का? मला आपण इयत्ता पहिलीच्या वर्गात शिकवलेलत आणि आदराने “बाई” म्हणणारी ती व्यक्ती भर रस्त्यात पटकन पायाशी झुकते तेव्हा लक्षात येतं बाईंच्या शिस्तीत, संस्कारात वाढलेली ही आजची तरुण पिढी आजही बालसंस्कारांनी प्रभावित आहे आणि बाईंच्या डोळयात अश्रु येतात खूप मोठा हो बाळा!

बालमित्रांनो आपण कितीही शिकलात मोठे झालात तरी शिक्षणाचा श्री गणेशा त्यांच्याकडून झाला त्या बाई आणि आपले इरालेसे बोट धरून आपल्याला आत्मविश्वासाने स्वतःच्या पायांवर अगदी लहापणापासूनच उभे राहायला शिकवणारी आई ह्या दोघींना विसरू नका कारण त्या दोघी संस्कारांची शिदोरी आपल्याला देऊन आपले आयुष्य दैदिप्यमान करतात अशा या आई व बाईंना मी विनम्रपणे अभिवादन करते.

प्रा. समृद्धी बाळासाहेब म्हात्रे,

विक्रोळी

# बालवयात होणारे अपघात

अपघात म्हणजेच अचानक घडणारा घात. एकदा असा प्रसंग घडतो की, ज्यामुळे बालकाच्या जीवाल धोका उत्पन्न होऊ शकतो व प्रसंगी जीवावर ही बेतू शकते.

पालकांच्या थोड्याशा दुर्लक्ष्यामुळे घरातील अनेक अपघात घडत असतात. नंतर असे वाटून जाते, अरे! हे सर्व तर आपण टाळू शकलो असतो. ज्या घरात लहान बालक आहे त्यांच्या पालकांनी तर सर्वतोपरी जागरूक राहण्याची खूपच गरज आहे.

सर्वसाधारणपणे ५ वर्षापर्यंतच्या बालकांना सतत आई-वडील व मोठ्यांच्या निरीक्षणाखाली ठेवण्याची गरज असते.

अपघात कशा प्रकारचे घडू शकतात याची साधारण वर्गवारी करावयाची झाल्यास आपण असे म्हणू की १) घरात होणारे अपघात २) घराबाहेर होणारे अपघात.

घरात होणारे अपघात -

अ) ऊंचावरून पडणे.

घरामध्ये कॉट, सोफा, खूर्ची, टेबल यासारख्या वस्तु असतात त्यावर चढून मुले दंगा मस्ती व खेळण्यात मग्न असतात. पालकांचे थोडेही दुर्लक्ष झाल्यास बालक त्यावरून पडून गंभीर दुखापत होण्याचा धोका असतो.

ब)पाण्यात बुडणे.

घरामध्ये आपल्या बाथरुम मध्ये असणारी भांडी, बकेट, टब मधील साठलेल्या पाण्यामुळे अपघात घडू शकतो. मुलांना पाण्याशी खेळायला आवडत असते. त्यामुळे मोठ्यांचा डोळा चुकवून मुले पाण्याकडे खेळण्यासाठी आकर्षित होतात. त्यामुळे पाण्यात बालक बुडण्याची शक्यता असते. मुलांना आंघोळ घालीत असताना एखादे वेळेस मोबाईल रींग वाजली तरी चुकूनही एकटे सोडून कॉल रीसीव्ह करू नये व

बालकाला पाण्याजवळ एकटे सोडू नये. घरामध्ये पाणी साठवणारी भांडी झाकून ऊंचावर ठेवावी.

क) औषधे.

आपल्या प्रत्येकाच्या घरात कोणत्या ना कोणत्या प्रकारची औषधे असतातच. लहान मुलांच्या घरात बाळाला लागणारी औषधे जसे ताप, सर्दी, खोकला, हगवण, पोटाच्या विकाराची औषधे सतत घरात ठेवावी लागतात. तसेच मोठ्या व्यक्तींच्या गोळ्या व औषधेच्या स्वरुपातील औषधे, डेटॉल, फिनाईल, डिटर्जंट, परफ्युम इ. सारखी औषधे मुलांच्या हाती लागणार नाहीत याची खबरदारी घ्यावी. सर्व खाण्याची औषधे व इतर वाफारासाठी वापरावयाची औषधे वेगवेगळी व कुलुपबंद ठेवावी. म्हणजे सहज लहान बालकाच्या हाती लागणार नाहीत. यामुळे होणारे अपघात टाळता येतील.

ड) काचेच्या वस्तु.

घरात असणाऱ्या काचेच्या वस्तु, क्रॉकरी व इतर ब्रेकेबल वस्तु मुलांच्या अपघाताला कारणीभूत ठरू शकतात. या बाबीकडे ही लक्ष दिल्यास त्यापासून होणारा धोका टळू शकतो.

इ) आगीपासून संरक्षण

मुलांना समज नसल्यामुळे व होणाऱ्या परीणामांची कल्पना नसल्यामुळे मुले आगीपासून होणाऱ्या दुर्घटनांना बळी पडतात. घरामध्ये शेगडी, गॅस, चूल इ. इंधनाची साधने असतात. त्यावर तयार होणारे गरम चहा, कॉफी, वरण गरम पेय, गरम पाणी इ. बालकाच्या अंगावर पडून अपघात घडू शकतात. त्यामुळे प्रत्यक्ष मोठ्या व्यक्ती बालकाच्या सानीध्यात राहून लक्ष दिल्यास अपघात टाळता येतात.

फ) लादीवर पदार्थ सांडणे

प्रत्येक घरामध्ये लादी असते. ती गुळगुळीत व पांढऱ्या किंवा इतर रंगाची

असल्यास त्यावर पाणी सांडलेल दिसतही नाही. तसेच लादीवर सांडणारे तेल, जॅम व इतर पदार्थावर पाय घसरून फ्रॅक्चर व गंभीर दुखापत घडण्याचा संभव असतो.

आमच्या शेजारी राहणाऱ्या छोट्या मुलाला (दोन वर्षाच्या) त्याचा मामा बाथरुममध्ये आंघोळ घालत होता. आंघोळ घातल्यानंतर त्या मुलाला टॉवेलने गुंडाळून घेतले. मुलाचे हातही टॉवेलच्या आत असल्यामुळे त्याला पायपुढे टाकता आला नाही व बाथरुमच्या दाराच्या टोकावर मुलगा पड़ून कपाळाला दुखापत झाली. सात टाके घ्यावे लागले.

जी) धारदार वस्तुंपासून होणारे अपघात.

आपल्या घरामध्ये बऱ्याच प्रकारची धारदार, टोकदार वस्तु असतात. जसे की सुरी, विळी, खिळे, कात्री, सुई इ. वस्तु कळत-नकळतपणे बालकाच्या हातात लागून अपघात घडू शकतो. याकडे ही लक्ष द्यावे.

एच) इलेक्ट्रीक शॉक

विजेच्या बऱ्याच वस्तु प्रत्येकाच्या घरात असतात. इस्त्री, कॉम्प्युटर, टिव्ही इ. ची बटणे. इलेक्ट्रीक बोर्डला हात लागल्यास अपघात घडू शकतो. हे टाळणेही तेवढेच गरजेचे आहे.

आय) कानात, नाकात, घशात एखादी वस्तु जाणे.

मुले फारच अल्लड असतात. त्यांना एखादी गोळी, चॉकलेट, ऊकडलेले अंडे, खाताना घशात अडकू शकते. किंवा सेफ्टीपीन, पैशाची नाणी, पोळीचा मासाचा तुकडा घशात अडकल्याची अनेक उदाहरणे आपण वाचतो व ऐकतो व पाहतो. म्हणून अशा घटना घडणार नाही याकडे ही पालकांनी लक्ष देण्याची गरज असते. कदाचीत असा एखादा प्रसंग घडलाच तर घरी उपचार करू नये. तर लवकरात लवकर तज्ञांची मदत घ्यावी.

घरा बाहरे होणारे अपघात.

अ) खेळण्याच्या वस्तुवरून पडणे.
बागेत असणाऱ्या खेळाच्या साहित्यावरून जसे की, घसरगुंडी, झोपाळा, झुला इ. वरून घसरून पडण्याची शक्यता असते.
ब) रस्ता ओलांडताना होणारे अपघात.
कधी कधी पालक बरोबर असतांना देखील रस्त्याच्या कडेने चालतांना किंवा रस्ता ओलांडताना ही अपघात घडण्याच्या घटना आपण पाहतो. म्हणून रस्त्याने चालतांना बालकाला मोठ्यांच्या डाव्या बाजूकडून हात धरून चालावे.
क) सण साजरे करताना घडणारे अपघात.
आपण दिवाळी, होळी, दहीहंडी इ. सण साजरे करताना त्यात लहान मुले ही आनंदाने भाग घेत असतात. दिवाळी मध्ये फटाके, सुरसुरी उडवताना मुलांना सोबत घेऊनच लक्ष देऊन आनंद साजरा करावा. जेणे करून सणावाराच्या आनंदावर विरजण पडणार नाही.
दहीहंडी साजरी करताना शक्यतो लहान मुलांना हंडी फोडण्यासाठी चढवणे टाळावे. होळीचा उत्सव साजरा करताना होळी पेटवताना निघणाऱ्या ज्वालांजवळ मुलांना एकटे सोडू नये. तसेच रंगपंचमी खेळतानाही असणारे रंग मुलांच्या चेहऱ्यावर लावू नये व मुलांच्या हातात रंग लागू देऊ नये.
दिवाळी सणाच्या वेळेस मी हॉस्पिटलमध्ये ड्यूटीवर असताना दोघे बहिण भाऊ फटाक्याने भाजून हॉस्पिटल मध्ये दाखल झाले होते.
घरामध्ये फटाके फोडायचे नाही. असे घरातील व्यक्तिंनी ठरवले होते कारण गेल्यावर्षी दिवाळीमध्ये त्यांच्या घरात लहान मुलीचा फटाक्याने भाजून मृत्यू झाला होता. मुलांना फटाके फोडण्यास बंदी घातल्यामुळे छोटी बहिण भाऊ हातात फटाका घेऊन घरात पेटवत होती. तेवढयात वडील आले आणि मुलीनी फटाका फ्रॉकमध्ये लपवला तर मुलानी

हातात. त्यामुळे फटाक्याचा स्फोट झाला व मुले भाजली.

ड) अपहरण -

लहान मुलांचे अपहरण करणे हे नित्याचेच झाले आहे. घराच्या समोरून खेळताना, अनोळखी व्यक्तीच्या ताब्यात दिल्यामुळे, प्रवासात मुलांकडे लक्ष न दिल्यामुळे शेजारी झोपलेल्या मुलांना उचलून नेल्याचे आपण ऐकतो. त्यासाठी अनोळखी व्यक्तींवर फालतु विश्वास टाकू नये. बोलणारी मुले असल्यास त्यांना नाव, घरचा पत्ता, मो.नंबर इ. माहिती शिकवावी.

अपघाताची ही यादी तर बरीच लांबत जाईल. अपघात घडण्यापेक्षा तो घडूच नये म्हणून अधिक खबरदारी घेतली तर अपघाताचे प्रमाण आपण बऱ्याच प्रमाणात कमी करू शकतो. यासाठी अधिक जागृत व सतर्क राहण्याची गरज आहे. म्हणतात ना ऊपचारा पेक्षा प्रतिबंध महत्त्वाचा.

संपर्क: ९८९२६४६१५०

सौ. आशा मिलिंद खिल्लारे

# सुप्रियाची कथा

बुद्धदेवांच्या काळातील ही कथा! श्रावस्ती नगरीत अनाथपिंड व नावाचा श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याला सुप्रिया नावाची सुंदर गुणी मुलगी होती. सुप्रिया एकुलती एक होती आणि अनाथपिंडकाची फार लाडकी होती. सुप्रियाने काहीही हट्ट केला असता तरी त्याने तो पुरवला असता. पण सुप्रिया खूप शहाणी मुलगी होती. इतरांची दुःखे समजून घेऊन आपल्याला होईल तेवढा ती दुःखे दूर करण्याचा प्रयत्न ती करीत असे. वडिल तिला रोज सोन्याच्या दोन मोहरा देत त्या सुप्रियाने कधीच चैनीसाठी, मौजमजेसाठी खर्च केल्या नाहीत. सुप्रिया कधी कपडेलत्ते खरेदी करीत असे तर कधी धान्य खरेदी करीत असे. धान्याची रास किंवा कपड्यांचा ढीग घेऊन रोज ती वाड्याच्या प्रवेशद्वाराशी बसे तिच्या दारावरून जे अनाथ गरजू, दीन दरिद्री लोक जात त्यांना ती गरजेपुरते धान्य आणि कपडे देत असे. सुप्रियाची परोपकारी वृत्ती पाहून अनाथपिंडकाला फार आनंद होई. तिच्या शांत प्रेमळ स्वभावामुळे वाड्यातील नोकरचाकर ही आपापल्या अडीअडचणी तिच्या कानावर घालीत. सुप्रिया आपल्या शक्तीनुसार त्या अडचणी दूर करण्याचा प्रयत्न करी.

एकदा ती अशीच वाड्याच्या प्रवेशद्वाराशी बसली असताना एक माणूस दोन गोजिरवाणी कोकरे घेऊन जातांना दिसला. तिने त्या माणसाला बोलावून म्हटले, “किती सुंदर आहेत ही कोकरे! थांब त्यांना गहू देते.” तिने त्यांच्या पुढे मूठ मूठ गहू दिले. कोकरं गहू खात असताना तिनं विचारलं “कुठे नेत आहेस र ही कोकरे?”

तो म्हणाला, “एक श्रीमंत माणूस उद्या कसला तरी यज्ञ करणार आहे त्या यज्ञात बळी देण्यासाठी त्यानं ही कोकरं मागितली आहेत. दोघांची किंमत म्हणून चांगल्या दोन रुप्याच्या मोहरा देणार आहे.”

ते ऐकून सुप्रियाचा जीव कळवळला. यज्ञात दोन लहानगे जीव बळी

जाणार याचं तिला वाईट वाटलं. तिनं म्हटलं, “मी तुला जर तेवढीच किंमत दिली तर मला ही कोकरं विकशील?” तो माणूस म्हणाला, “चालेल की ताई! मला किंमत मिळाल्याशी कारण! ती त्या माणसाकडून मिळाली काम किंवा तिमच्याकडून मिळाली काय! मला काहीच हरकत नाही.” त्याला थांबायला सांगून सुप्रिया तशीच आत गेली. तिने अनाथपिंडकाजवळ दोन रुप्याच्या मोहरा मागितल्या तेव्हा त्याने कशासाठी हव्यात ते विचारलस. बळी जाणाऱ्या कोकरांना सोडवण्यसाठी तिला पैसे हवेत हे ऐकून अनाथपिंडकाला फार समाधान वाटलं. प्राण्याबद्दल तिच्या मनातील सहानभूतीला त्याने उत्तेजन दिलं यानंतर तिला अस कुणीही पशुबळीसाठी जनावर नेत असताना दिसलं तर ती ते सोडवून घेई. त्यासाठी योग्यतेवढी किंमत हि देई. आपल्या बारा तेरा वर्षांच्या मुलीच्या मनातील करुणा आणि इतरांची दुःखे दूर करण्याची धडपड पाहिली की अनाथपिंडक चकित होई. आपल्या मुलीला नीट मार्गदर्शन करणारा थोर गुरु हवा असं त्याला वाटे.

योगायोगाने त्याच सुमारास गौतम बुद्ध आपल्या शिष्यसमुदायासह तिथे आले. बुद्धाचे प्रवचन ऐकून अनाथपिंडकाला खूप आनंद झाला. भिक्षू न होता संसारात राहून आपली मुलगी ही तत्त्वे आचरणात आणते तिला मार्गदर्शन द्यावे अशी त्याने बुद्धाला विनंती केली.

गौतम बुद्धांनी मुलीला घेऊन यायला सांगितले. फक्त बारा वर्षांची मुलगी अहिंसा, भूतदया, सहानुभूती, निर्वैरता ही तत्त्वे आचरणात आणते याचे बुद्धांना मोठे कौतुक वाटले. तिची दिनचर्या त्यांनी ऐकली. तिने इतक्या लहान वयात श्रावस्तीतील अनेक अनाथ गरजू जिवांना मदत केली, दुःखी लोकांचे अश्रू पुसले बळी द्यायला नेले जाणारे निष्पाप मूक जीव वाचविले. हे ऐकून बुद्धांना समाधान वाटले.

त्यानंतर बुद्धदेवांच्या रोजच्या प्रवचनांना सुप्रिया हजेरी लावू लागली. ती

भिक्षुणी संघाच्या महाप्रजापती गौतमींची पट्टशिष्या झाली. पुढे श्रावस्ती नगरीत दुष्काळ पडला, तेव्हा आपल्याकडे प्रवचनांना येणाऱ्या मोठाल्या व्यापाऱ्यांना बुद्धांनी सांगितलं की गोरगरिबांना मदत करायला हवी. पण त्या काळात कुणीही मदत करायला राजी होईना. सुप्रिया मात्र तहानलेल्यांना पाणी पाजत होती. भुकेने कासाविस झालेल्यांना जमेल तेवढे धान्य वाडत होती. पण ती एकटी कुठवर पुरी पडणार? अनाथपिंडक आणखी धान्य विकत आणायला परगावी गेला त्यादिवशी ती जेतवनात बुद्ध देवांकडे एकटीच गेली. त्या दिवशी बुद्धदेवानी थोर व्यापारी धनिकांना परत एकदा लोकांना अन्नदान देण्याचं आवाहन केलं. पण आपल्याजवळ अन्नसाठा अपुरा असल्याचं सांगून सगळ्यांनी हात झटकले.

बुद्धदेव डोळे मिटून बसले असताना सगळ्यांनी काढता पाय घेतला. एकटी सुप्रिया बसून होती. बुद्धदेवांनी डोळे उघडले सगळे गेलेले पाहून त्यांना फार वाईट वाटलं ते म्हणाले, “माझ्या धर्माची दीक्षा घेऊनही दुष्काळग्रस्तांसाठी कुणाचंच अंतःकरण दयेने भरून येत नाही? कुणीही मदतीचा हात पुढे करत नाही?”

सुप्रिया आत्मविश्वासाने म्हणाली, “मी करते मदत.” बुद्धदेव म्हणाले, “बाळा, तू एकटी कुठवर पुरी पडणार?” सुप्रिया म्हणाली, “आपण मला फक्त आशीर्वाद द्या. मी काम सुरु करते.” बुद्धदेवांनी तिला मनःपूर्वक आशीर्वाद दिले.

दुसऱ्या दिवशी सामन्त राज जयसेन आपल्या कुटुंबियांसह जेवायला बसणार इतक्यात सुप्रिया आली. जयसेनने तिचं स्वागत केल ती धनिकश्रेष्ठी अनाथपिंडकाची मुलगी होती. गावातील नामवंत घराण्यातील मुलगी होती. त्यानं सुप्रियाला येण्याचं कारण विचारलं. तिने हातातील कटोरा पुढे करत म्हटलं “थोडीफार भिक्षा घाला.”

जयसेन म्हणाला, “धनवान श्रेष्ठींची तू एकुलती एक मुलगी आणि अशी भीक मागतेस?”

सुप्रिया म्हणाली, “माझ्यासाठी नाही महाराज! दुष्काळत भुकेने तडफडून मरणाऱ्यांसाठी भीक मागते. आता दारोदार भिक्षा मागण्याखेरीज काही उपाय नाही.”

जयसेनना शरम वाटली. त्यांनी घरातून पोतेभर धान्य आणून तिच्या हवाली केले. अशा तऱ्हेने त्या दिवशी ती श्रावस्तीभर हिंडली धान्याच्या राशी जमा झाल्या. त्या तिने भुकेल्या लोकांना वाटल्या. ती खूप थकली होती. पण तिचं मन समाधानाने काठोकाठ भरलं होतं.

सुप्रियाचं हे कार्य ऐकल्यावर बुद्धदेवांना फार समाधान वाटल! “माझी शिकवणूक ह्या एवढ्याश्या लहान मुलीने आचरणात आणली! सहकार्याने कोणत्याही संकटाचा सामना करता येतो आणि समाजावरील संकटकाळी सगळ्यांनीच त्याग करायचा असतो. हे तिनं आपल्या वागणुकीने दाखवून दिलं! प्रत्येक गावी अशी एक सुप्रिया असली तरी पुरे!” अस बुद्धदेव म्हणाले. त्यांनी केलेल्या गौरवाने सुप्रियाला फार आनंद झाला. पुढेही आयुष्यभर तिने बुद्धदेवांची तत्त्वे आचरणात आणत असंख्य लोकांना मदत केली.

माधवी कुंटे

दूरध्वनी : २६११६४८०

# वर्तन संस्कार

समाजात वावरताना अनेक घटना प्रसंग येतात. तऱ्हतऱ्हेची परिस्थिती असते. अशावेळी केव्हा कसं वागावं याचे काही नियम असतात. हे संस्कार लहान मोठे सर्वांच्याच मनावर व्हायला हवेत. त्यातल्या काही वर्तन संस्कारांची माहिती करून घेऊ या.

घरी पाहुणे आले असताना -

- पाहुणे रहायला अले असतील तर वयस्क व्यक्तीच्या हातातील सामान घ्यावे. त्यांना खोलीत न्यावे.
- त्यांनी हातपाय धुतल्यावर पाणी द्यावे प्रवास कसा झाला याची चौकशी करावी.
- पाहुणे थोड्या वेळाकरता आले असतील तरीही अगत्याने चौकशी करावी. पण एकदम त्यांच्या येण्याचे प्रयोजन विचारू नये ते पुढे आपोआप पाहुणेच सांगतिल तोवर वाट पहावी.
- जेवायच्यावेळी कुणी आले तर जेवायला बसवावे. एरवी कालानुसार चहा सरबत वगैरे देऊन पाहुणचार करावा.
- वयाने वडिलधारे असतील त्यांना वाकून नमस्कार करावा.
- त्याचवेळी आपल्याला कुठे जायचे असेल तरी घरातील एखाद्या व्यक्ती निदान पाहुण्यांबरोबर असेल अशी शक्यतो व्यवस्था करावी.
- तशी व्यवस्था होऊ शकत नसेल तर अचानक आलेल्या पाहुण्यांबरोबर थोडा काळ थांबावे नंतर आपली अडचण त्यांच्या कानावर घालावी.
- पाहुणे असतांना टी.व्ही. रेडीओ लावू नये किंवा वर्तमानपत्रे मासिके वाचू नये.
- पाहुणे असतांना आणखी कुणी त्यावेळी घरी आले तर त्यांची व पाहुण्यांची रीतसर ओळख करून द्यावी.

- पाहुण्यांना एखादी भेटवस्तू आपल्यासाठी आणली असेल तर ती कृतज्ञतापूर्वक स्वीकारून त्याचे कौतुक करावे.
- पाहुण्यांचे खाणे पिणे झाल्याशिवाय आपण आधीच उठून आत जाऊन कपबशा वगैरे धुवायला लागू नये.
- पाहुणे काही मदत मागायला आले असतील तर यथाशक्ती मदत करावी. जर मदत करणे शक्य नसेल तर तसे मृदुशब्दात पण स्पष्टपणे सांगावे.
- पाहुण्यांची लहान मुले बेशिस्त वागत असतील आणि पाहुणे त्याबाबत काही बोलत नसतील तर आपण गोड शब्दात समज द्यायला हरकत नाही.
- आपलं बोलणं मोकळेपणाचं पण वडिलधाऱ्यांची अदब राखून असावे.
- हसतमुखाने स्वागत करावं आणि हसतमुखाने निरोप द्यावा.